**महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव येथील सह व्यवस्थापकीय संचालक या पदावर प्रतिनियुक्तीने पदस्थापना करणे -**
**श्री.प्रशांत जगदीश साजणीकर, सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन आदेश क्रमांक: गोचिन-२०२५/प्र.क्र.२८/सां.का.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०४ एप्रिल, २०२५

वाचा : १. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम ४०.
२.सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/ कार्या.१२, दिनांक १७.१२.२०१६
३. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही २०१६/प्र.क्र.५१०/ कार्या.१२, दिनांक १६.०२.२०१८.
४. श्री.प्रशांत साजणीकर, सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग यांचा दि.१७ मार्च, २०२५ रोजीचा अर्ज.

**शासन आदेश:**

श्री. प्रशांत साजणीकर, सह सचिव, ( वेतनश्रेणी S-२७: रुपये १२३१००-२१५९०० ) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई येथे कार्यरत असून त्यांची महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई येथील सह व्यवस्थापकीय संचालक या रिक्त पदावर या शासन आदेशान्वये सोबत जोडण्यात आलेल्या परिशिष्टातील अटी व शर्तीच्या अधिन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

०२. श्री. प्रशांत साजणीकर, सह सचिव यांची सहव्यवस्थापकीय संचालक या पदावर प्रतिनियुक्तीने **तीन वर्षे** किंवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत जे आधी घडेल तो पर्यंत पदस्थापना करण्यात येत आहे.

०३. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम ४० अन्वये परिशिष्ट-२ नुसार तसेच वित्त विभाग आणि सामान्य प्रशासन विभाग यांनी वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचना विचारात घेऊन, सदर प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती सोबतच्या परिशिष्टामध्ये विहीत केलेल्या आहेत.

०४. श्री.प्रशांत साजणीकर, सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग यांनी सह व्यवस्थापकीय संचालक या पदाचा कार्यभार पदभार स्वीकारल्यानंतर श्री. सुजितकुमार उगले, संचालक,

पुराभिलेख संचालनालय, मुंबई यांच्याकडील सदर पदाचा अतिरिक्त कार्यभार आपोआप संपुष्टात येईल.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०४०४१६५३११२६२३ असा आहे. सदरचे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2025.04.04 16:55:23 +05'30'

**( सुमंत दि. पाष्टे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. प्रशांत जगदीश साजणीकर, सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**प्रत:**

१) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
६) उपसचिव (सां.का.१), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) श्री. सुजितकुमार उगले, संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-१, लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
९) सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२) निवड नस्ती.

<u>**परिशिष्ट**</u>

( पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन आदेश क्रमांक: गोचिन-२०२५/प्र.क्र.२८/सां.का-१, दिनांक : ०४ एप्रिल, २०२५ रोजीचे सहपत्र )

"महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम ४० मधील तरतूदीनुसार प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती:-

१) <u>**प्रतिनियुक्तीचा कालावधी :**</u> श्री. प्रशांत जगदीश साजणीकर यांची महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम ४० मधील तरतुदीनुसार त्यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे. तसेच, प्रतिनियुक्तीचा कालावधी हा रुजू झाल्यापासून **तीन वर्षे** इतका किंवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत जे आधी घडेल तो कालावधी असेल.

अ) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनास आवश्यक वाटली तर त्यांना त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी पूर्ण होण्यापूर्वी स्वीयेत्तर सेवातून केव्हाही परत बोलावण्याचा हक्क शासनास असेल.

आ) त्यांच्या सेवेची आवश्यकता महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांना नसेल तर त्यांना त्यांच्या मूळ विभागात म्हणजेच सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई या विभागाकडे परत पाठविण्याची मुभा महामंडळास राहील. मात्र, तत्पूर्वी किमान ३ महिने अगोदर शासनास तसे कळविणे आवश्यक राहील आणि

इ) जर त्यांना आपल्या मूळ विभागाकडे परत यावयाचे असेल तर त्यांना मूळ विभागात परत येण्याची मुभा राहील. मात्र, तत्पूर्वी किमान ३ महिने अगोदर शासनास तसे कळविणे आवश्यक राहील.

२) <u>**वेतन-**</u> ते प्रतिनियुक्तीच्या कालावधीत "सह व्यवस्थापकीय संचालक" हे पद धारण करतील. परंतु, सदर कालावधीत त्यांच्या सह सचिव (S-२७: रुपये १२३१००-२१५९००) या मूळ पदाची वेतन संरचना लागू असेल. महामंडळ हे स्वायत्त असल्यामुळे आणि शासनाकडून कोणतेही वेतन अनुदान अदा करत नसल्यामुळे त्यांना प्रतिनियुक्ती भत्ता लागू असणार नाही.

३) <u>**महागाई भत्ता-**</u> राज्य शासनाकडील त्यांचे वेतनमान कायम ठेवतील किंवा स्वीयेत्तर सेवेतील पदाशी संलग्न असणाऱ्या वेतनमानात वेतन घेतील. त्याप्रमाणे त्यांना राज्य शासनाकडील किंवा महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई या महामंडळाच्या नियमानुसार अनुज्ञेय असलेला महागाई भत्ता मिळण्याचा हक्क असेल.

४) <u>**घरभाडे भत्ता / स्थानिक पूरक भत्ता**</u> - त्यांना राज्य शासनाच्या नियमांनुसार वेळोवेळी अनुज्ञेय असेल त्याप्रमाणे घरभाडे भत्ता, स्थानिक पूरक भत्ता मिळण्याचा हक्क असेल.

५) **पदग्रहण अवधी वेतन आणि बदली प्रवास भत्ता-** स्वीयेत्तर सेवेत बदली झाल्यानंतर आणि तेथून परत आल्यानंतर अशा दोन्ही वेळच्या पदग्रहण अवधीमध्ये त्यांचे वेतन व प्रवास भत्ता, राज्य शासनाच्या संबंधित नियमानुसार महामंडळाकडून देण्यात येतील.

६) **प्रतिनियुक्तीच्या कालावधीत कर्तव्यार्थ केलेल्या प्रवासाकरिता प्रवास भत्ता-** स्वीयेतर सेवेत रुजू झाल्यानंतर कराव्या लागणाऱ्या प्रवासाकरिता राज्य शासनाच्या संबंधित नियमांन्वये किंवा महामंडळाच्या नियमान्वये प्रवास भत्ता आणि दैनिक भत्ता मिळण्याचा हक्क असेल.

७) **रजाः-** प्रतिनियुक्तीच्या कालावधीत महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ हे नियम लागू असतील. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ च्या नियम १८ (२) मध्ये दिलेल्या कार्यपध्दतीचा काटेकोरपणे अवलंब करण्यात यावा. स्वीयेतर सेवेतून मुक्त झाल्यानंतर त्यांना परस्पर रजेवर जाण्यास महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई या महामंडळाने परवानगी देता कामा नये. म्हणजेच प्रथम शासकीय सेवेत रुजू होऊन मूळ विभागाच्या सक्षम प्राधिका-याकडून नेहमीच्या पध्दतीने त्यांनी आपली रजा मंजूर करुन घेतली पाहिजे. स्वीयेतर सेवेच्या कालावधीत अथवा अखेरीस घेतलेल्या रजेच्या कालावधीबद्दल द्याव्याच्या रजा वेतनाचा कोणत्याही पूरक भत्त्याच्या संबंधातील संपूर्ण खर्च त्यांच्या मूळ विभागाला सोसावा लागेल.

८) **विकलांगता रजेबद्दल रजा वेतन:-** स्वीयेतर सेवेत किंवा अशा सेवेमुळे आलेल्या विकलांगतेबद्दल मंजूर करता येईल अशा रजेच्या संबंधात, अशी विकलांगता स्वीयेतर सेवा संपल्यानंतर उघडकीस आली तरीसुध्दा रजावेतन देण्यास महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई हे महामंडळ जबाबदार असेल. अशा रजा वेतनाचा खर्च महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई या महामंडळाकडून वसूल करण्यात येईल.

९) **रजा वेतन आणि निवृत्तीवेतन अंशदान**:- सदरचे महामंडळ स्वायत्त असून, राज्य शासनाकडून कोणतेही अनुदान घेत नसल्याने, रजा वेतन व निवृत्ती वेतन अंशदान महामंडळाने शासनाकडे जमा करण्याची आवश्यकता असेल.

१०) **रजा मुदती प्रवास सवलत:-** त्यांना राज्य शासनाच्या संबंधित नियमातील तरतूदीनुसार रजा मुदती प्रवास सवलत मिळण्याचा हक्क असेल. या संबंधातील खर्च महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई हे महामंडळास सोसावा लागेल.

११) **वैद्यकीय सवलतीः-**त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (वैद्यकीय उपचार) नियम, १९६१ अनुसार अनुज्ञेय असणाऱ्या वैद्यकीय सुविधापेक्षा कमी प्रतीच्या नसतील, अशा सुविधा मिळण्याचा हक्क असेल आणि त्यावरील खर्च महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई हे महामंडळाला सोसावा लागेल.

१२) **सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधीची वर्गणीः** -स्वीयेत्तर सेवेतील राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधी खात्यात जमा करावयाच्या सर्व रक्कमा महामंडळाने भविष्य

निर्वाह निधी लेखांकनासाठी विहित केलेल्या परिपूर्ण अनुसूचीसह थेट महालेखापाल १/२, मुंबई/नागपूर यांच्या कार्यालयात रेखांकित धनाकर्षाद्वारे अथवा स्थानिक रेखांकित धनादेशाद्वारे जमा करावी.

वरील कार्यपध्दतीचा अवलंब न करता अशा रक्कमा चलनाद्वारे बँकेत (कोषागाराशी निगडीत बँक) भरणा केल्यास चलनावर खातेदाराचा संपूर्ण तपशील नमूद करावा. त्याचप्रमाणे चलनासोबत सर्व तपशील भरलेली भविष्य निर्वाह निधी खात्याच्या लेखांकनास विहित केलेली अनुसूची जोडण्याची दक्षता घ्यावी. या तपशील अभावी रकमा खातेदाराच्या खात्यात उशिराने जमा झाल्यास, त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित कार्यालयाची तसेच संबंधित अधिकाऱ्याची राहील. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांना त्यांच्या भविष्य निर्वाह निधी खात्यातून परतावा / ना-परतावा अग्रिम मंजूर करण्यास शासन) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे मंजुरीसाठी पाठविण्यात यावेत.

१३) **विभागीय चौकशी :-** त्यांच्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु करावयाची असेल, तर त्यांना त्यांच्या मूळ विभागाकडे परत पाठविण्यात येईल. शासन त्यांना निर्वाह भत्ता देईल, परंतु तो महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई या महामंडळाकडून वसूल करण्यात येईल.

१४) **बोनस/सानुग्रह प्रदान:-** त्यांना बोनस किंवा सानुग्रह प्रदान अनुज्ञेय नाही. तथापि, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई या महामंडळामध्ये बोनस किंवा सानुग्रह प्रदान जाहीर करण्यात येत असल्यास, (त्यांच्यावर बोनस देण्याचे कायदेशीर बंधन नसले तरीही) संस्थेने जाहीर केलेले सानुग्रह प्रदान स्वीकारण्यास त्यांना परवानगी देता येईल.

१५) **गट विमा योजना:-** त्यांच्या वेतनातून राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजनेच्या वर्गणीपोटी महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई हे महामंडळाकडून दरमहा वसूल करील आणि ही रक्कम धनादेशाद्वारे महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई यांच्याकडे पाठवेल. सदर रक्कम "८०११ विमा व निवृत्ती वेतन निधी इतर विमा व निवृत्तीवेतन निधी राज्य शासकीय कर्मचाऱ्यांची गट विमा योजना (८०११ ००५९)" या लेखाशीर्षाखाली जमा दर्शविण्यात यावी. सदर वर्गणी भरण्यास विलंब करण्यात आल्यास विलंब कालावधीत दंडनीय दराने व्याज आकारण्यात येईल.

१६) **कर्ज आणि अग्रिम:-** प्रतिनियुक्तीच्या कालावधीत, भविष्य निर्वाह निधी परतावा / प्राप्त / ना-परतावा अग्रिम, घरबांधणी अग्रिम, मोटारकार अग्रिम, वैयक्तिक संगणक अग्रिम मंजूर करण्यास शासन सक्षम असेल. याबाबतचे त्यांचे अर्ज त्यांच्या मूळ विभागाकडे मंजुरीसाठी पाठविण्यात यावेत. महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई या महामंडळाने त्यांना सदर अग्रिम मंजूर करु नये.

१७) **प्रतिनियुक्तीवर असताना रजेवरुन अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर नियुक्ती :-** त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत रजेवर गेल्यास किंवा प्रशिक्षणासाठी गेल्यास आणि ते धारण करीत असलेल्या पदावर अन्य अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्यात आली आणि रजेवरुन

अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर त्यांची नियुक्ती अन्य पदावर करण्यात आली तर रजा वेतन, वेतन, पदग्रहण अवधी, सक्तीचा खोळंबा कालावधी, इत्यादीबाबत सर्व खर्च रजा समाप्तीच्या अथवा प्रशिक्षण समाप्तीच्या दिनांकापासून ते अन्य पदाचा कार्यभार धारण करणे या दिनांकापर्यंत महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई या महामंडळाला सोसावा लागेल.

१८) **प्रतिनियुक्ती कालावधीत देशात/परदेशात प्रवास**:- महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई या महामंडळाकडे प्रतिनियुक्तीवर असताना सदर महामंडळाच्या कामासंबंधात देशात कोठेही प्रवास करावयाचा झाल्यास, शासनाच्या पूर्वपरवानगीची आवश्यकता असणार नाही. मात्र, महामंडळाच्या कामाच्या संबंधात परदेशी जावयाचे असल्यास, शासनाची पूर्वपरवानगी आवश्यक असेल. त्याचप्रमाणे महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई या महामंडळाशी प्रत्यक्ष संबंध नसलेल्या शासकीय, निमशासकीय कामानिमित्त अथवा खाजगी संस्थांच्या समारंभासाठी देशांतर्गत प्रवास करावयाचा असल्यास त्यासाठी शासनाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक राहील.

१९) **बढती:-** प्रतिनियुक्तीवर असताना त्यांची मूळ विभागात बढती होण्याची वेळ आली असेल, तर सर्वसाधारणपणे त्यांची प्रतिनियुक्ती पुढे चालू ठेवू नये. तथापि सक्षम प्राधिकाऱ्याने त्यांची प्रतिनियुक्ती पुढे चालू ठेवली तर, त्यांना निकट-निम्नता नियमानुसार बढतीच्या पदाचे वेतन मंजूर केले जाईल आणि निकट निम्नता नियमाचा लाभ सहा महिन्यानंतर अनुज्ञेय असणार नाही.

२०) **कायमचे समावेशन**:- जर मागाहून त्यांची महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई या महामंडळाच्या सेवेमध्ये सामावून घेतले जाण्याची इच्छा असेल व अशा प्रस्तावास शासनाची मान्यता मिळाल्यास, त्यांना सामावून घेतले जाईल त्या दिनांकापासून ते शासकीय सेवेतून निवृत्त झाल्याचे मानले जाईल.

२१) **शासनाने वेळोवेळी विहीत केलेले नियम लागू करणे:-** त्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत शासन वेळोवेळी जे नियम करील किंवा जे कार्यकारी आदेश निर्गमित करील ते नियम कार्यकारी आदेश यथास्थिती लागू असतील.

-----------